महाराष्ट्र लोकसेवा आयोगाबरोबर पत्रव्यवहार
करताना अनुसरावयाची कार्यपध्दती

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक, क्रमांक : मलोआ-१०९५/४३९/प्र.क्र.२४/९५/आठ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ जून, १९९५.

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.पीएससी-१०८१/८५४/१२,
दिनांक १९ ऑगस्ट, १९८१
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मलोआ-१०९३/मुस-४८/
प्र.क्र.६५/९३/आठ, दिनांक ३० डिसेंबर, १९९३

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र लोकसेवा आयोग ही सांविधानिक संस्था असून आयोगाचा स्वतःचा स्वतंत्र असा दर्जा आहे. त्यामुळे आयोगाशी पत्रव्यवहार करण्यासाठी मंत्रालयीन विभागांना काही मार्गदर्शक सूचना आयोगाच्या स्थापनेपासून दिलेल्या आहेत. "मुंबई लोकसेवा आयोगाबरोबर पत्रव्यवहार करताना आयोगाशी केला जाणारा पत्रव्यवहार सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे नावे अग्रेषण पत्राद्वारे करावयाचा असतो." सदरहू तरतुदीचा पुनरुच्चार उपरोक्त दिनांक १९ ऑगस्ट, १९८१ च्या शासन परिपत्रकाद्वारे करण्यात आलेला आहे. प्रस्तुत तरतुदींचे मंत्रालयीन विभागांकडून गांभीर्याने पालन केले जात नाही, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अग्रेषण पत्राशिवाय आयोगाकडे केल्या जाणाऱ्या पत्रव्यवहारावर आयोगाने आक्षेप घेतला आहे.

२. या पार्श्वभूमीवर सर्व मंत्रालयीन विभागांना पुनश्च: विनंती करण्यात येते की, त्यांनी आयोगाकडे पत्रव्यवहार करताना तो सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे नावे अग्रेषण पत्राद्वारे केला जाईल याबाबत योग्य ती दक्षता घ्यावी. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाबरोबर पत्रव्यवहार करताना अनुसरावयाच्या कार्यपध्दतीसंबंधात उपरोक्त दिनांक ३० डिसेंबर, १९९३ च्या परिपत्रकात नमूद केलेल्या सूचनांचे देखील काटेकोरपणे पालन केले जाईल याबाबत काळजी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
( य.मा.जोशी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सर्व मंत्रालयीन विभाग.

(सोबत : "महाराष्ट्र लोकसेवा आयोगाबरोबर पत्रव्यवहार करताना अनुसरावयाची कार्यपध्दती" याबाबतच्या विषयावरील शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मलोआ-१०९५/ ४३९/ प्र.क्र.२४/ ९५/ आठ, दि.१५ जून, १९९५ च्या परिपत्रकाची प्रत, त्यात नमूद त्या विभागाची दिनांक ३० डिसेंबर,१९९३ व दिनांक १९ ऑगस्ट, ~~१९९४~~ १९८९ च्या परिपत्रकांच्या प्रतीसह.)

....................

क्रमांक : एचडीई- ३००१/ १५४४/ आस्थापना-२,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३ ऑगस्ट, २००१.

उपरोक्त शासन परिपत्रकान्वये, आयोगाबरोबर पत्रव्यवहार करताना तो अतिशय काळजीपूर्वक योग्य भाषेत करावा आणि, सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे नावे अग्रेषण पत्राद्वारे करावा अशा सामान्य प्रशासन विभागाच्या सूचना आहेत. सदर सूचना दिलेल्या असूनही या सूचनांचे काटेकोरपणे पालन होत नसल्याचे आयोगाने शासनाच्या निदर्शनास आणले आहे. सदर कृती गंभीर स्वरुपाची आहे. यापुढे उपरोक्त परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना प्रमाणे आयोगकडे पत्रव्यवहार न झाल्याबाबत आयोगाने अशा बाबी शासनाच्या निदर्शनास आणल्यास संबंधितांविरुध्द कडक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

(ना. रों. शीरे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व पर्यवेक्षीय अधिकारी, गृह विभाग,
सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, गृह विभाग,
निवडनस्ती, आस्थापना-२.

*********

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक शाकाप-१०९७/प्र.क्र.३१/९७/१८(रवका)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ३ जून, १९९७.

प रि प त्र क

केंद्र सरकार, इतर राज्ये, महालेखापाल, न्यायालये, लोकसेवा आयोग, लोकआयुक्त, वगैरेंशी म्हणजेच ज्या व्यक्ती किंवा संस्था शासनाच्या अधिपत्याखाली नाहीत, त्यांच्याशी पत्रव्यवहार करतांना विशेष सौजन्यपूर्वक भाषा वापरणे जरुर आहे. तसेच असा पत्रव्यवहार कमीत कमी उपसचिवांच्या स्तरावरुन करण्यात यावा, अशा सूचना "मंत्रालयीन टिप्पणीलेखन व पत्रव्यवहार" या पुस्तिकेत देण्यात आलेल्या आहेत. तसेच राज्यपालांच्या सचिवांच्या कार्यालयाकडे पाठवावयाचे सर्व संदर्भ अवर सचिवाहून कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याच्या आदेशान्वये पाठविले पाहिजेत, अशा सूचना "मंत्रालयीन अनुदेश" या पुस्तिकेत नमूद केलेल्या आहेत.

वरील सूचनांचे पालन न झाल्याने औचित्य भंग झाल्याची तक्रार शासनाकडे प्राप्त झाली आहे. या संदर्भात शासन आता असे आदेश देत आहे की, वर नमूद केलेल्या संविधानिक संस्था तसेच मा. राज्यपाल यांच्या कार्यालयाशी पत्रव्यवहार करतांना किमान उपसचिव स्तरावरुन करण्यात यावा. तसेच त्यांच्या कार्यालयाकडून कोणतीही माहिती किंवा अभिप्राय/खुलासा मागवितांना तो अतिशय सौम्य शब्दांत व सविनय मागविण्यात यावा, जेणेकरुन या संविधानिक संस्थांचा मान पूर्णपणे राखला जाईल व औचित्याचा भंग होणार नाही. आवश्यक असल्यास काही ठिकाणी संबंधित सचिव/उपसचिवांना याबद्दल त्या कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्यांशी संपर्क साधून स्वत: किंवा दूरध्वनीवरुन माहिती प्राप्त करुन घेण्याचा प्रयत्न करता येईल.

या सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची सर्व विभागांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्र.अ.जोशी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,